सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) लेखाशीर्षांतर्गत निधी वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावවि-२०२१/प्र.क्र.२८/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१.०३.२०२२.

वाचा:-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.६.४.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.२४.६.२०२१
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/असं/ प्र.क्र.०९/२०२१-२२/१७०,दि. ६.८.२०२१
४) शासन निर्णय क्रमांक साववि-२०२१.क्र.प्र/२८-फ/११२४ .दि ,.०८.२०२१.
५) शासन निर्णय क्रमांक साववि-२०२१/प्र.क्र.२८/फ-११,दि.२४.१२.२०२१.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.१७.०३.२०२२.
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/असं/ प्र.क्र.१७/२०२१-२२/७०७, दि. २८.०३.२०२२

प्रस्तावना :-

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक ६.३.२०१७ अन्वये राज्यातील राष्ट्रीय हरित सेना हा कार्यक्रम अस्तित्वात असलेल्या ८८०७ शाळांमध्ये विद्यार्थी हरित सेना ही नविन योजना राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील सर्व जिल्ह्यातील प्रती शाळा रू.२५००/- प्रमाणे ८८०७ शाळांसाठी विद्यार्थी हरित सेना या योजनेंतर्गत सन २०१६-१७ पासून इकोक्लब असलेल्या शाळांना राज्यामार्फत अनुदान उपलब्ध करून देण्यात येते.

२. विद्यार्थ्यांना पर्यावरणाच्या समस्येबाबत तसेच सद्यस्थितीबाबत विविध उपक्रमांद्वारे अद्यावत माहिती देणे, पर्यावरण संरक्षणाच्या व संवर्धनाच्या प्रत्यक्ष कामांमध्ये त्यांना सहभागी करून घेणे आणि त्यांच्या माध्यमातून जन सामान्यांमध्ये जनजागृतीकरणे ही या योजनेची मुख्य उद्दिष्टे आहेत.

३. राज्यातील ८८०७ इकोक्लब शाळांपैकी ज्या शाळांमार्फत सदर योजना चांगल्याप्रकारे राबविण्यात येत आहे, अशा एकूण २४०० इकोक्लब शाळांची निवड करण्यात आली असून, प्रति शाळा रू. २५००/- याप्रमाणे रू.६०.०० लक्ष इतक्या अनुदानाची आवश्यकता असल्याचे प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी कळविले आहे.

४. विध्यार्थी हरित सेना या योजनेंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित निधी व वित्त विभागाने सुधारित अंदाजानुसार वितरणासाठी उपलब्ध केलेल्या निधीची माहिती पुढीलप्रमाणे आहे:-

| योजनेचे नाव | सन २०२१-२२ करिता अर्थसंकल्पित निधी (लक्ष रू.) | | सन २०२१ करिता सुधारित अंदाजानुसार (RE) उपलब्ध निधी (लक्ष रू.) | |
|---|---|---|---|---|
| विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) | ५० -इतर खर्च | १००.०० | ५० -इतर खर्च | ६०.०० |
| | एकूण | १००.०० | एकूण | ६०.०० |

५. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) योजनेंतर्गत या विभागामार्फत वितरीत करण्यात आलेला निधी व सुधारित अंदाजानुसार शिल्लक निधी पुढीलप्रमाणे आहे :-

(रू. लाखात)

| **योजनेचे नाव** | **सुधारित अंदाजानुसार (RE) उपलब्ध निधी** | **शासन निर्णयांन्वये वितरित करण्यात आलेला निधी** | | | **सन २०२१-२२ करिता शिल्लक निधी** |
|---|---|---|---|---|---|
| | **५० -इतर खर्च** | **५० -इतर खर्च** | | **एकूण एकंदर** | **५० -इतर खर्च** |
| | | दि.२४.०८.२१ | दि.२४.१२.२१ | | |
| विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) | ६०.०० | १०.०० | ३०.०० | ४०.०० | २०.०० |

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांच्या संदर्भाधिन दि. २८.०३.२०२१ रोजीच्या पत्रानुसार विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) योजनेंतर्गत उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) योजनेकरिता सन २०२१-२२ च्या सुधारित अंदाजानुसार रु.६०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित असून ६०% च्या पुर्वीच्या मर्यादेनुसार या विभागाच्या दि.२४.०८.२०२१ व दि.२४.१२.२०२१ च्या शासन निर्णयांद्वारे रु.१०.०० लक्ष व रू. ३०.०० लक्ष असा एकूण रु. ४०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सुधारित अंदाजानुसार वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार १०.०० लक्ष निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन**
**(०१) (००३) शिक्षण व प्रशिक्षण (००) (०४) विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४)**
**५०- इतर खर्च**

८. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १, २, ६ व ७ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक/शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ./१४४/व्यय-१० दि. ३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१२२००३९५४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda99613688793f8ffb2d4595af5
, 2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08887e4e01ce080,
postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2ee7a3f1c7dcc565527
1c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.03.31 22:04:41 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वन संरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त ).
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त ).
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा).
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे ).
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर.
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई.
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२.
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. निवडनस्ती फ-११.